माजी सैनिक/आणीबाणी राजादिष्ठ अधिकारी व अल्पकालीन सेवा राजादिष्ठ अधिकारी यांना शासकीय सेवेत वर्ग-१, वर्ग-२ मधील पदावर नेमणूक देतांना वयोमर्यादेत शिथिलता देण्याबाबत.

---

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक: आरटीए-१०८८/११९२/सीआर-३२/८९/१६-अ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक २८ मे, १९९२.

## शासन निर्णय

केंद्र शासनाने माजी सैनिक आणि राजादिष्ठ अधिकारी ज्यामध्ये आणीबाणी राजादिष्ठ अधिकारी/अल्पसेवा राजादिष्ठ अधिकारी यांना केंद्र शासनाच्या सेवेत सरळसेवा प्रवेशाने ग्रुप-ए व ग्रुप-बी पदावरील नियुक्तीसाठी वयोमर्यादेत सवलत देण्याबाबत निर्णय घेतला आहे, त्या धर्तीवर राज्यशासनांतर्गत वर्ग-१ व वर्ग-२ मधील पदांवरील नियुक्तीसाठी अशा सवलती देण्याबाबतचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. त्यावर विचार करुन शासनाने असा निर्णय घेतला आहे की :-

[१] ज्या, माजी सैनिक/आणीबाणी व अल्पसेवा राजादिष्ठ अधिकाऱ्यांची सैन्यातील सलग सेवा किमान सहा महिने किंवा त्या पेक्षा जास्त झाली आहे अशा माजी सैनिक/राजादिष्ठ अधिकाऱ्यांना सैन्यातील सेवेचा कालावधी अधिक तीन वर्षे इतकी कमाल वयाची सवलत महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत घेण्यात येणाऱ्या स्पर्धा परीक्षा-व्यतिरिक्त सरळसेवा प्रवेशाने नियुक्तीसाठी देण्यात यावी. [म्हणजेच त्यांच्या वयातून सैनिकी सेवेचा कालावधी कमी केल्यावर परिणामस्वरूप वय हे विहित वयोमर्यादेपेक्षा तीन वर्षांहून अधिक असू नये.]

[२] ज्या माजी सैनिक/आणीबाणी व अल्पसेवा राजादिष्ठ अधिकाऱ्यांची किमान पाच वर्षे सैन्यात सलग सेवा झाली आहे व ज्यांना नेमून दिलेले काम पूर्ण झाल्यावर कार्यमुक्त केले आहे [यामध्ये ज्याचे नेमून दिलेले काम पुढील सहा महिन्यांत पूर्ण होणार आहे व त्यानंतर त्यांना कार्यमुक्त करण्यात येणार आहे त्यांचाही समावेश असेल] किंवा ज्यांच्या बाबतीत पाच वर्षांचा सैनिकी सेवेचा नेमून दिलेला कालावधी पूर्ण झाला आहे व ज्यांची नेमणूक पाच वर्षांपुढे वाढवून देण्यात आलेली असून त्यांना शासकीय सेवेत नेमणूक मिळाल्यास तीन महिन्यात कार्यमुक्त करण्यात येईल असे प्रमाणित करण्यात येणार असेल अशा व्यक्तींसाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगातर्फे घेण्यात येणाऱ्या स्पर्धा परीक्षाव्दारे सरळसेवा प्रवेशाने नियुक्तीसाठी पाच वर्षे कमाल वयोमर्यादेत सवलत देण्यात यावी.

२. ज्या, माजी सैनिक/आणीबाणी व अल्पसेवा राजादिष्ट अधिकारी यांची सेवा बडतर्फीने, गैरवर्तणूक किंवा अकार्यक्षमता या कारणांसाठी अथवा सैनिकी सेवेसाठी शारिरीक क्षमता नसल्याने किंवा आजारपणामुळे संपुष्टात आणली आहे, अशा व्यक्ती ह्या आदेशांनुसार वयोमर्यादेच्या सवलतीसाठी पात्र ठरणार नाहीत.

३. माजी सैनिक या संज्ञेची सुधारित व्याख्या केंद्र शासनाने त्यांची अधिसूचना क्रमांक:- ३६०३४/५/८५/इएसटी [एससीटी], दिनांक २७ ऑक्टोबर, १९८६ व अधिसूचना क्रमांक:- ३६०३४/५/८५/इएसटीटी [एससीटी], दिनांक २७ मार्च, १९८७ रोजी प्रसिध्द केली आहे व ती शासन पृष्ठांकन, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: रासैमं-१०८७/२१८१/३८, दिनांक ११ मार्च, १९८८ नुसार प्रसृत करण्यात आली आहे. त्यातील व्याख्या सवलतीसाठी विचारात घ्यावी.

४. प्रस्तुत आदेशानुसार माजी सैनिक, आणीबाणी व अल्पसेवा राजादिष्ट अधिकारी यांना नागरी सेवेतील वर्ग-१ व वर्ग-२ मधील पदावर नियुक्ती देतांना फक्त वयोमर्यादेत सवलत देण्यात येते. ह्या आदेशानुसार एकदा वयोमर्यादेतील सवलतींचा फायदा घेऊन ज्या माजी सैनिक/आणीबाणी व अल्पसेवा राजादिष्ट अधिकाऱ्यांनी नागरी सेवेत प्रवेश केला आहे ते माजी सैनिक/आणीबाणी व अल्पसेवा राजादिष्ट अधिकारी सवलतींचा फायदा पुन्हा घेण्यास पात्र ठरणार नाहीत.

५. सर्व मंत्रालयीन विभाग तसेच त्यांच्या अधिपत्याखालील विविध विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख यांनी माजी सैनिक/आणीबाणी व अल्पसेवा राजादिष्ट अधिकाऱ्यांना नेमणूक देताना वरील निर्णय विचारात घ्यावा. मंत्रालयीन विभागांनी हे आदेश त्यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील संबंधीत शासकीय उपक्रम, महामंडळे, औद्योगिक संस्था, जिल्हा परिषदा, महापालिका इत्यादींच्या निदर्शनात आणावेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

अ. सु. वाघमारे,
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
विशेष कार्य अधिकारी, मुख्य मंत्र्यांचे कार्यालय,
सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
प्रबंधक, मूळ न्यायशाखा, उच्च न्यायालय [पत्राने],
प्रबंधक, उच्च न्यायालय, [अपील शाखा], मुंबई [पत्राने],
प्रबंधक, लोकायुक्त व उप लोकायुक्त यांचे कार्यालय, महाराष्ट्र, मुंबई [पत्राने],
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई [पत्राने],
सचिव, सर्व प्रादेशिक निवड मंडळे,
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई [पत्राने],

सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
मंत्रालयातील सर्व विभाग,
सचिव, महाराष्ट्र राज्य सैनिक मंडळ, पुणे,
सेवायोजन संचालनालय, मुंबई,
माहिती व जनसंपर्क महासंचालक, मुंबई (प्रसिध्दीपत्रक निर्गमितीसाठी),
महसूल व वन विभाग/ग्राम विकास विभाग/शिक्षण व सेवायोजन विभाग/नगर विकास विभाग/सार्वजनिक आरोग्य विभाग/वित्त विभाग,
मंत्रालयीन विभागांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई,
महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर,
महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन क्रमांक- १२, १३-अ, १४, १४-अ, १६-ब, २८,
निवड नस्ती.

---